**महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियान व त्या अंतर्गत पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन पुरस्कार स्पर्धा (दुसरे वर्ष)**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन निर्णय क्र.सीडीए २०१०/(४१४/२०१०)/लाक्षेवि (कामे)
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक २३ फेब्रुवारी, २०११

**वाचा :-** शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.सीडीए-१००५/(४१७/०५)/लाक्षेवि (कामे), दिनांक २१/८/२००९

**प्रस्तावना :-**

सिंचन व्यवस्थापनात लाभधारकांचा सहभाग यशस्वी होण्यासाठी कार्यान्वित पाणी वापर संस्थांचे व्यवस्थापन कार्यक्षम राहून संस्था नेहमीसाठी स्वबळावर सुदृढपणे कार्यरत राहणे आवश्यक आहे. पाणी वापर संस्थांना प्रोत्साहन देण्याकरिता पाणीवापर संस्थांच्या व्यवस्थापनामध्ये स्पर्धा निर्माण होण्यासाठी महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियान व त्या अंतर्गत दरवर्षी पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन पुरस्कार स्पर्धा आयोजित करण्याचा शासन निर्णय दि. २१/८/२००९ अन्वये घेण्यात आलेला आहे. तसेच या पुरस्कार स्पर्धेकरीता प्रदेशस्तरीय विभागात प्रदेशस्तरावर प्रथम क्रमांक व द्वितीय क्रमांकाच्या पाणी वापर संस्थांना अनुक्रमे रुपये तीन लक्ष व रुपये दोन लक्ष आणि राज्यस्तरावर प्रथम क्रमांक, द्वितीय क्रमांक व तृतीय क्रमांकाच्या पाणी वापर संस्थांना अनुक्रमे रुपये सात लक्ष, रुपये पाच लक्ष व रुपये तीन लक्ष पुरस्कार आणि प्रशस्तीपत्र देण्यात येणार आहे. सदर पुरस्कार वितरण समारंभ दरवर्षी **"दि.२६ फेब्रुवारी"** रोजी (कै. शंकररावजी चव्हाण, माजी केंद्रिय गृहमंत्री व महाराष्ट्र राज्याचे माजी मुख्यमंत्री यांचा स्मृतीदिन) **"सिंचन दिनाच्या"** दिवशी आयोजित केला जातो.

**शासन निर्णय :-**

महात्मा फुले पाणी वापर संस्था व त्याअंतर्गत पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर व्यवस्थापन स्पर्धा वर्ष २०१०-११ करीता राज्यस्तर व प्रादेशिक या स्तरावरील पुरस्कारासाठी शासनाने पुढीलप्रमाणे पाणी वापर संस्थांची निवड केली आहे.

## राज्यस्तरीय पुरस्कार प्राप्त पाणी वापर संस्था

**राज्यस्तरीय प्रथम पुरस्कार** – विघ्नहर पाणी वापर संस्था क्र.११०, बेलवंडी, ता.श्रीगोंदा, जि. अहमदनगर

**राज्यस्तरीय द्वितीय पुरस्कार** – श्री ज्योतिर्लिंग पाणी वापर संस्था मर्यादित, बेनिक्रे,ता.कागल,जि.कोल्हापूर

**राज्यस्तरीय तृतीय पुरस्कार** – शिवशक्ती पाणी वापर सहकारी संस्था, निघोज,ता.पारनेर, जि.अहमदनगर

## प्रदेशस्तरीय पुरस्कार प्राप्त पाणी वापर संस्था

| प्रदेश | प्रदेशस्तरीय पुरस्कार | पाणी वापर संस्थेचे नाव | प्रकल्पाचे नाव |
|---|---|---|---|
| नाशिक | प्रथम क्रमांक | श्रीदत्त पाणी वापर संस्था, चांदा, ता.नेवासा, जि. अहमदनगर | मुळा प्रकल्प |
| | द्वितीय क्रमांक | बळीराजा पाणी वापर संस्था, जानोरी, ता. दिंडोरी, जि.नाशिक | वाघाड प्रकल्प |
| पुणे | प्रथम क्रमांक | श्रीनाथ कालवा पाणी वापर संस्था मर्यादित त्रिपूटी, ता. कोरेगांव, जि.सातारा | धोम प्रकल्प |
| | द्वितीय क्रमांक | श्री भैरवनाथ कालवा पाणी वापर सहकारी संस्था मर्यादित, फत्यापूर, ता.जि. सातारा | कण्हेर प्रकल्प |
| अमरावती | प्रथम क्रमांक | जयकिसान पाणी वापर संस्था, शेंदूरजनाघाट, ता.वरुड, जि.अमरावती | सातनूर लघु प्रकल्प |
| | द्वितीय क्रमांक | जनता पाणी वापर संस्था, शेंदूरजना घाट, ता.वरुड, जि. अमरावती | सातनूर लघु प्रकल्प |
| औरंगाबाद | प्रथम क्रमांक | सिध्देश्वर पाणी वापर सहकारी संस्था मर्यादित, हिंगणी ता.पैठण, जि.औरंगाबाद | जायकवाडी प्रकल्प |
| | द्वितीय क्रमांक | सावशिद बाबा पाणी वापर सहकारी संस्था मर्यादित, आवडे उंचेगाव, ता.पैठण, जि. औरंगाबाद | जायकवाडी प्रकल्प |
| नागपूर | प्रथम क्रमांक | गाढवी नदी पाणी वापर संस्था,, मडेघाट, ता.लाखांदूर, जि. भंडारा | इटियाडोह प्रकल्प |
| | द्वितीय क्रमांक | जयहनूमान पाणी वापर संस्था, कोरंबी, ता.अर्जूनी / मोर, जि.गोंदिया | इटियाडोह प्रकल्प |
| कोकण | प्रोत्साहनपर पुरस्कार | देवकोप पाणी वापर संस्था, ता.पालघर, जि. ठाणे | देवकोप लघु पाटबंधारे योजना |

पाणी वापर संस्था व्यवस्थापन स्पर्धेअंतर्गत पाणी वापर संस्थांना प्रत्येक स्तरावर वितरीत करण्यात येणा-या पुरस्काराच्या रकमेचा विनियोग करण्यासाठी पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना संदर्भिय शासन निर्णयात देण्यात आल्या आहेत.

१) पुरस्कार प्राप्त झालेल्या पाणी वापर संस्थेची विशेष आमसभा बोलवून त्या सभेत विनियोगाबाबत निर्णय घेण्यात यावा.

२) पाणी वापर संस्थेच्या प्रशासकीय व कार्यालयीन नवीन बाबींसाठी पुरस्कार रकमेच्या ५ टक्के पर्यंत खर्च करण्यात यावा.

३) पाणी वापर संस्थेच्या दृष्टीने सामुहिक उपयोगाची यंत्रसामुग्री उपकरणे (छोटे ट्रॅक्टर, मळणी यंत्र इ.) खरेदी करणेबाबत आमसभेच्या सर्वसंमतीने निर्णय घेण्यात यावा. तसेच प्रति घनमीटर पाण्यात जास्तीतजास्त कृषी उत्पादन करणेसाठी उपाययोजना करण्याकरिताही निर्णय घेण्यात यावा.

४) पुरस्काराच्या रकमेतून कोणत्याही परिस्थितीत पाणीवापर संस्थेच्या दैनंदिन स्वरुपाचा खर्च करता येणार नाही.

५) शिल्लक राहणारी पुरस्काराची रक्कम पाणी वापर संस्थेच्या नावे राष्ट्रीयकृत बँकेत मुदत ठेव, राष्ट्रीय बचत प्रमाणपत्र वगैरे मध्ये गुंतवावी. प्राप्त व्याजाच्या रकमेचा विनियोग आमसभेच्या मान्यतेने करता येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०२२३१९०५०१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(ज. मा. लिहीतकर)
शासनाचे उप सचिव

प्रत,
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मा मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व अप्पर मुख्यसचिव, प्रधान सचिव व सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
आयुक्त, कृषी, पुणे व आयुक्त, सहकार, पुणे
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
जलसंपदा विभागातील सर्व कार्यकारी संचालक
महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद
जलसंपदा विभागातील सर्व मुख्य अभियंता व अधिक्षक अभियंता
जलसंपदा विभागातील सर्व कार्यकारी अभियंता
नियोजन विभाग (का.क्र.१४३३), मंत्रालय, मुंबई /वित्त विभाग, (व्यय-१२) मंत्रालय, मुंबई
संपर्क अधिकारी, (जलसंपदा विभाग) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
श्री. श्री. ना. लेले, अध्यक्ष, सोपेकॉम, पुणे
श्री. भरत कावळे, समाज परिवर्तन केंद्र, लोहीयानगर, ओझर, ता.निफाड, जि. नाशिक